मा. राज्यपाल यांच्या अधिसूचनेनुसार अनुसूचित क्षेत्रातील सुनिश्चित केलेली १२ संवर्गातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवारांमधून भरण्याच्या अनुषंगाने करावयाची पुढील कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र. : बीसीसी -२०१४/ प्र.क्र.२१३-A /१४/१६-ब**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक: २६ जून, २०१५.

वाचा:- १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०७२/जे, दि.६ जून १९७२.
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी ११८७/२७७६/सीआर-२९६/८७/ १६-ब, दि.१५ ऑक्टोबर.१९८७.
३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९३/२१६७/सीआर १४१/९३/ १६-ब, दि.१८ जून १९९४.
४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९३/२१६७/सीआर १४१/९३/ १६-ब, दि. १ सप्टेंबर, १९९७.
५) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९८/प्र.क्र ११६/९८/१६-ब, दि.२० सप्टेंबर १९९९.
६) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २००१/३५३/प्र.क्र-१४/२०००/१६-ब, दि.१३ ऑगस्ट २००२.
७) महाराष्ट्र राज्य लोकसेवा (अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, निरधिसूचित जाती (विमुक्त जाती),भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्ग यांच्यासाठी आरक्षण) अधिनियम, २००१
८) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-१/४७४/२०१४, दि.९ जुन,२०१४
९) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-२/४७४/२०१४/७३०, दि. १४ ऑगस्ट, २०१४
१०) शासन परिपत्रक क्र.बीसीसी-२०१४/प्र.क्र.२१३A/१४/१६-ब, दि.३१ जुलै,२०१४
११) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ ई-११०१९(१६)(२०१४) /अधिसूचना-५ /११२२/२०१४, दि.३१.१०.२०१४
१२) शासन निर्णय क्र.बीसीसी -२०१४/ प्र.क्र.२१३A /१४/१६-ब, दि. ५.मार्च २०१५

**प्रस्तावना** :

उपरोक्त क्र. १२ येथील दिनांक ५ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा. राज्यपाल यांच्या अधिसूचनेनुसार अनुसूचित क्षेत्रातील सुनिश्चित केलेली सरळसेवेने भरण्यात येणारी १)तलाठी, २) सर्वेक्षक, ३) ग्रामसेवक, ४ ) अंगणवाडी पर्यवेक्षक, ५) शिक्षक, ६) आदिवासी विकास निरीक्षक, ७) कृषि सहाय्यक, ८)पशुधन विकास पर्यवेक्षक, ९) ए.एन.एम (सहाय्यक परिचारिका प्रसविका), १०) बहुद्देशिय आरोग्य कर्मचारी, ११) वनरक्षक, १२) कोतवाल या १२ संवर्गातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवारांमधून भरण्याच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी मार्गदर्शक सुचना निर्गमित केलेल्या आहेत. याबाबत काही कार्यालयांकडून सदरची पदे कशाप्रकारे भरावीत व कोणत्या बिंदुनामावलीमध्ये नवीन नियुक्त कर्मचाऱ्यांचा समावेश करावा याबाबत विचारणा होत असल्याने त्याबाबत आता पुढील प्रमाणे सूचना या शासन शुध्दिपत्रकाव्दारे देण्यात येत आहेत:-

**<u>शुध्दीपत्रक -:</u>**

संदर्भीय दि. ५ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील अनुक्रमांक १३ व १४ वगळण्यात येत आहे. त्याऐवजी पुढीलप्रमाणे परिच्छेद समाविष्ट करण्यात येत आहेत.

१३. (१) सदरचे १२ संवर्गातील अनुसूचित क्षेत्रातील स्थानिक अनुसूचित जमातीची सर्व पदे भरेपर्यंत त्या - त्या संवर्गासाठी (अनुसूचित क्षेत्राबाहेर व अनुसूचित क्षेत्रासाठी) एकच बिंदुनामावली असेल.

(२) सदर बिंदू नामावलीनुसार कार्यरत कर्मचाऱ्यांमध्ये दर वर्षी बदली, सेवा निवृत्ती व इतर कारणांमुळे रिक्त होणाऱ्या पदांपैकी अनुसूचित क्षेत्रात रिक्त होणारी पदे परंतू जास्तीत जास्त जिल्हयातील एकूण रिक्त पदांच्या २०% पदे ही अनुसूचित क्षेत्रातील स्थानिक अनुसूचित जमातीच्या कर्मचाऱ्यांमधून भरण्यात यावीत व उर्वरित पदांना उपरोक्त संदर्भाधिन अ.क्र.१२ येथील दि.५.३.२०१५ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ९ प्रमाणे विहित आरक्षण लावून त्यानुसार सदर पदे अनुसूचित क्षेत्राबाहेर भरण्यात यावीत.

(३) अनुसूचित क्षेत्रातील रिक्त पदे स्थानिक अनुसूचित जमातीमधील उमेदवारांमधून जसजशी भरली जातील त्या उमेदवारांची वर्षनिहाय स्वतंत्र यादी तयार करुन त्यांच्या नावासमोर स्थानिक अनुसूचित जमाती असा शेरा लिहावा.

(४) अनुसूचित क्षेत्राबाहेरील पदांवर अनुज्ञेय आरक्षणानुसार, भरण्यात येणाऱ्या उमेदवारांची देखील वर्षनिहाय व प्रवर्गनिहाय स्वतंत्र यादी ठेवण्यात यावी.

(५) संदर्भाधिन क्रमांक ८, क्रमांक ९ व क्रमांक ११ येथील संबंधित पदांबाबतच्या अधिसूचना निर्गमित करण्यापूर्वी जर निवड प्रक्रीया सुरु झाली असेल तर त्यावेळी जिल्हयाच्या प्रचलित असलेल्या बिंदूनामावली नुसार पदे भरण्यात यावीत व अधिसूचित क्षेत्रात स्थानिक आदिवासींना घेण्यात यावे.

१४. वरील परिच्छेद क्र. १३ मधील उप परिच्छेद (२), (३) व (४) येथे नमुद करण्यात आलेली कार्यपध्दती, अनुसूचित क्षेत्रातील सर्व पदे स्थानिक अनुसूचित जमातीमधील उमेदवारांमधुन भरली जात नाहीत, तोपर्यंत सुरु राहील.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२६१७२८०३४६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395c596b57a69fe04109b8c8191e7389cff5eda3fac16c6f8263be7fbbd319d, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2015.06.26 17:35:51 +05'30'

**( टि.वा.करपते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा
६) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य.
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८) मु. स. (र. व का.) सामान्य प्रशासन विभाग
९) अपर मुख्य सचिव,महसूल व वन विभाग
१०) अपर मुख्य सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग
११) अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग,
१२) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग
१३) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग
१४) प्रधान सचिव, महिला व बालकल्याण विभाग
१५) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग,
१६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग

१७) सचिव) साविस व विचौअ-२ ,(सामान्य प्रशासन विभाग
१८) सचिव, शालेय शिक्षण विभाग
१९) सचिव, पदुम (कृषी व पदुम विभाग)
२०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा)
२१) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद)
२२) सर्व विभागीय आयुक्त,
२३) सर्व सहायक आयुक्त (मावक)
२४) सर्व जिल्हाधिकारी,
२५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,
२७) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
२८) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
३०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३१) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
३२) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
३३) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
३४) संचालक, समाजकल्याण, पुणे,
३५) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
३६) संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
३७) संचालक, सेवायोजन, मुंबई,
३८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
३९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
४०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
४२) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई
४३) निवड नस्ती, कार्यासन १६-ब.

***********